केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आयुष अभियानांतर्गत सन २०२३-२४ करिता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य घटकासाठी २२१०G५७४ या लेखाशिर्षातून ६०% केंद्र हिश्श्याचे रू. २७५.४२७ लक्ष व २२१०G५८३ या लेखाशिर्षातून ४० % राज्य हिश्श्याकरिता रु.१८३.६१८ लक्ष इतके असे एकूण रु.४५९.०४५ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२३/प्र.क्र.३७४/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.

२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ आयुष (SCSP)/५१९३८-९४४/२०२३-२४, दिनांक १८.०७.२०२३ चे पत्र.

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो), दि.२३/०८/२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय आयुष अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना सप्टेंबर, २०१४ मध्ये सुरु करण्यात आली असून, सदर योजनेनुसार देशातील सामान्य जनतेकरिता आयुष आरोग्य सेवा व शिक्षण उपलब्ध करणे, आयुर्वेदिक, होमिओपॅथिक व युनानी औषधांचा दर्जात वाढ करणे व सातत्यपूर्ण गुणात्मक औषधी वनस्पती पुरवठा करणे इ. घटकांचा समावेश करण्यात आला असल्याचे कळविले आहे. त्याकरिता आवश्यक निधीचे संपूर्ण वितरण करणे गरजेचे असल्याचे कळविले आहे. केंद्र शासनाच्या सुचनेनुसार राष्ट्रीय आयुष अभियानास प्राप्त होणारे अनुदान राज्य शासनाकडे जमा होऊन कोषागारामार्फत अनुदानाचे वितरण होत आहे. केंद्र शासनाच्या दि.२३ मार्च २०२१ रोजीच्या ज्ञापनान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन प्रणालीबाबत सुधारीत कार्यपध्दती अवलंबणेबाबत निर्देश देण्यात आले आहे. राष्ट्रीय आयुष अभियानाकरीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य घटका करिता (SCSP) सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून केंद्र हिस्सा राज्य आयुष सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आयुष अभियान अंतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य घटका करिता (SCSP) केंद्र व राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात केंद्र हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५७४ खाली रु.३८६.३० लक्ष तसेच राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२१०G५८३ खाली रु.२५७.५३ लक्ष एवढी तरतुद अर्थसंकल्पित केलेली आहे. सबब केंद्र हिश्श्यापोटी रु.२७५.४२७ लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रू.१८३.६१८ लक्ष इतके अनुदान राज्य आयुष सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आयुष सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | | | (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ ची अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (केंद्र ६०%) व (राज्य ४०%) |
| १ | मा.क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य, ७८९ अनुसुचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१)(०३) राष्ट्रीय आयुष अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०G५७४ | ३८६.३० | २७५.४२७ |
| २ | मा.क्र. एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य, ७८९ अनुसुचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, | २२१०G५८३ | २५७.५३ | १८३.६१८ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | (०१)(०४) राष्ट्रीय आयुष अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | | |

४. वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आयुष सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आयुष सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

८. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १२८/२०२३ दि.२३/०८/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७६२/२०२३/व्यय-१४ दि. ०४/०८/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२७२०१३३०६५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.08.24 18:06:47 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणॆ
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११.निवडनस्ती ( आरोग्य -७) .